| | |
|---|---|
| Convertion in Regular Temparary Establishment :- Shri Tukaram Phogu Meshram and other 7 Workers working under S.E.& Administrator,CADA, Nagpur | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांच्या अधिपत्याखालील सर्वश्री तुकाराम फागो मेश्राम व इतर ७ मजूर यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत. |

**महाराष्ट्र शासन,**
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक एसयुटी २०११/(५५/२०११)/आ(कामगार)
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ०५/०४/२०११

पहावे :-१) अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांचे पत्र क्रमांक ७४५५/लाविप्रा/आली ७/२००९, दिनांक १६.१२.२००९.
२) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक रुअआ ५९६/२२८/सेवा-५, दिनांक २४.४.२००१.

**प्रस्तावना :-**

सर्वश्री. तुकाराम फागो मेश्राम व इतर ७ कामगारांची पाणी वाटपासाठी किरकोळ मजूर म्हणून नेमणूक करण्यात आली होती. काम संपल्याने सदर कामगारांना कामावरुन कमी करण्यात आले. त्यामुळे त्यांनी तृतीय कामगार न्यायालय, नागपूर येथे यु.एल.पी.ए.क्र. २९१/९३ ते २९८/९३ अन्वये शासनाविरुध्द दावे दाखल केले. त्यानुषंगाने सदर कामगारांना दि.२०.२.१९९३ पासून कामावर पून:स्थापित करावे व कामावरुन काढल्याच्या दिनांकापासून थकबाकी दयावी असा निर्णय न्यायालयाने दि.११.४.२००१ रोजी दिला. सदर निर्णयाविरुध्द मा.औद्योगिक न्यायालय, नागपूर येथे शासनाच्यावतीने पुनर्विलोकन अर्ज (युएलपीए) क्र.१२९/०१ ते १३६/०१ दाखल करण्यात आले. सदर पुनर्विलोकन अर्जासंदर्भात दि.६.४.२००४ रोजी अंतिम निर्णय होवून मा. तृतीय कामगार न्यायालय,नागपूर यांचा पुन:स्थापित करण्याबाबतचा दि.११.४.२००१ चा निर्णय मान्य करण्यात आला आणि तृतीय कामगार न्यायालयाने मान्य केलेल्या थकबाकीपैकी केवळ १० टक्के थकबाकी देण्याचा निर्णय दिला. मा. औद्योगिक न्यायालय,नागपूर यांच्या दि.६.४.२००४ च्या आदेशाविरुध्द मा.औद्योगिक न्यायालय,नागपूर येथे क्र.२/०४ ते ९/०४ हे पुनर्विलोकन अर्ज दाखल करण्यात आले. त्या संदर्भात दि.३१.३.२००५ रोजी अंतीम निर्णय

होवून त्यामध्ये पुनर्विलोकन अर्ज फेटाळून मा.तृतीय कामगार न्यायालय,नागपूर यांचा दि.११.४.२००१ चा निर्णय कायम केला. दि.३१.३.२००५ च्या सदर निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालय,नागपूर येथे रिट पिटीशन क्र. ५२१६/०५ ते ५२२३/०५ दाखल करण्यात आले. सदर रिट पिटीशनस् दि.२.२.२००६ रोजी खारिज करण्यात आले आणि औद्योगिक न्यायालयाचा दिनांक ३१.३.०५ चा निर्णय मान्य करण्यात आला. सदर निर्णयाविरुध्द अपीलात जाऊ नये असे अभिप्राय विधी व न्याय विभाग,नागपूर यांनी दिले. त्यामुळे मा.औद्योगिक न्यायालय,नागपूर येथील पूनर्विलोकन अर्ज (युएलपीए) क्र.१२९/२००१ ते १३६/२००१ संदर्भात दिनांक ६.४.२००४ च्या निर्णयानुसार दिनांक १८.०७.२००७ च्या बैठकीत घेतलेल्या सचिव समितीच्या मान्यतेने सर्वश्री. तुकाराम फागो मेश्राम व इतर ७ कामगारांना दिनांक २०.२.१९९३ पासून मजूर पदी रोजंदारी आस्थापनेवर सेवासातत्यासह पुनःस्थापित करुन दिनांक २०.२.१९९३ पासून ते पुनःस्थापित करण्याच्या दिनांकापर्यतच्या एकूण थकबाकीपैकी १० टक्के थकबाकी अदा करण्याचे आदेश दि.७.८.२००७ च्या पत्रान्वये दिले. त्यानुसार संबंधित कामगारांना दि.४.९.२००७ पासून रोजंदारी आस्थापनेवर मजूर पदी रुजू करुन घेण्यात आले आहे. तसेच त्यांनी दाखल केलेले सर्व न्यायालयीन दावे न्यायालयामधून मागे घेतले असून सद्यःस्थितीत न्यायालयात कोणताही दावा प्रलंबित नाही.

सर्वश्री. तुकाराम फागो मेश्राम, अभिमान लक्ष्मण देशपांडे, रामू भाकरुजी चौधरी, जर्नादन जंगलू देशपांडे, श्रीपत कोंडू देशमुख, मधूकर बापूराव लांजेवार,शिवदास झोलबा शामकुंवर व परसराम कवडूजी ठाकरे यांना न्यायनिर्णयानुसार दिनांक २०.२.१९९३ पासून सेवासातत्य देण्यात आलेले आहे. हे कामगार शासन निर्णय, सा.बां.वि.,दि.२४.४.२००१ च्या परि.१(१) व परि.२ मधील अटीची पूर्तता करीत असून त्यानुसार सलग ५ वर्षाच्या सेवेनंतर त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा दिनांक १९.२.१९९८ असा आहे. सदर कामगारांना पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांच्या अधिपत्याखालील सर्वश्री. तुकाराम फागो मेश्राम व इतर ७ मजूर यांना मजूर पदी अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यास खालीलप्रमाणे शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र | कर्मचा-यांचे नांव | आस्थाप-नेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रु.अ.आ.वर आणवयाचे दिनांक | रु.अ.आ. वर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री.तुकाराम फागो मेश्राम | रोजंदारी | मजूर २०.२.१९९३ | २०.२.१९९८ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग) |
| २ | श्री. अभिमान लक्ष्मण देशपांडे | रोजंदारी | मजूर २०.२.१९९३ | २०.२.१९९८ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग) |
| ३ | श्री.रामू भाकरुजी चौधरी | रोजंदारी | मजूर २०.२.१९९३ | २०.२.१९९८ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग |
| ४ | श्री.जर्नादन जंगलू देशपांडे | रोजंदारी | मजूर २०.२.१९९३ | २०.२.१९९८ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग) |
| ५ | श्री.श्रीपत कोंडू देशमुख | रोजंदारी | मजूर २०.२.१९९३ | २०.२.१९९८ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग) |
| ६ | श्री.मधूकर बापूराव लांजेवार | रोजंदारी | मजूर २०.२.१९९३ | २०.२.१९९८ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग) |
| ७ | श्री.शिवदास झोलबा शामकूंवर | रोजंदारी | मजूर २०.२.१९९३ | २०.२.१९९८ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग) |
| ८ | श्री.परसराम कवडूजी ठाकरे | रोजंदारी | मजूर २०.२.१९९३ | २०.२.१९९८ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग) |

२.	उपरोक्त कामगारांना त्यांनी धारण केलेल्या पदांवर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

३.	अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांनी या आदेशातील सर्व बाबी विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत,याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत ि-नर्गमित करुन ते संबंधित कर्मचा-यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव,	पदनाम,त्यांचा प्रथम नियुक्तीचा दिनांक व त्यांचा रुपांतरीत अस्थायी आस्थापनेचा दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिका-यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत. तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तीशः निदर्शनास आणावेत. शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचा-यांची (नांव,पदनाम,त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापोवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्यांच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब" मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र(Undertaking) घेवून ते त्या कर्मचा-यांच्या सेवापटात/सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपाल अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल,याबाबत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत/त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला

जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचा-यांच्या नेमणूकांच्या आदेशांच्या प्रती,नाममात्र हजेरी पटाच्या प्रती,आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

४. सदर कामगारांना दि.४.९.२००७ पासून रोजंदारी आस्थापनेवर मजूर पदी रुजू करुन घेण्यात आले आहे. त्यामुळे त्यांना दिनांक २०.२.१९९३ पासून प्रत्यक्ष सेवेत घेतल्याच्या दिनांकापर्यंतची म्हणजेच दि.४.९.२००७ पर्यंतची १० टक्के थकबाकी देण्यात यावी. तसेच प्रत्यक्ष सेवेत घेतल्याच्या दिनांक ४.९.२००७ पासून या आदेशाच्या दिनांकापर्यंतची पूर्ण थकबाकीची रक्कम त्यांना रोखीने दयावयाची असून ती धनादेशाव्दारे (cheque) अदा करावी. तथापि, त्यांच्या वेतनाची परिगणना त्यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

५. या प्रस्तावावरील खर्च सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक रुअआ १५९६ / २२८/ सेवा-५, दिनांक २४ एप्रिल २००१ अवये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

७. हा शासन निर्णय www.maharashtra.gov.in हया संकेत स्थळावर २०११०४०५१६२८५०००१ हया संकेत क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्र :- **प्रपत्र- ब**

( अ.अ.कोदे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
महालेखापाल,लेखा परिक्षा ,महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
वित्त विभाग(व्यय १२), मंत्रालय,मुंबई
अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग,नागपूर
आस्थापना(कामगार)संग्रहार्थ.